**राज्यात नागपूर, अमरावती, वर्धा जिल्ह्यात स्थापन करण्यात आलेल्या "सिट्रस इस्टेट" या योजनेच्या कार्यक्रम अंमलबजावणीकरिता सन २०१९-२० करिता ₹ १५.०० कोटी इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणे व ६० % निधी वितरित करण्यास मान्यता देणेबाबत. (लेखाशिर्ष-२४०१ B०२५)**

महाराष्ट्र शासन

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन शुध्दीपत्रक क्र. संप्रऊ-२०१८/प्र.क्र.८९/भाग-४/९-अे,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: ०७ डिसेंबर, २०१९

वाचा:- (१) शासन निर्णय क्रमांक: संप्रऊ-२०१८/प्र.क्र.८९/भाग-४/९-अे, दिनांक २० नोव्हेंबर, २०१९.

(२) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा.क्र.कृआ/फ-२/सिट्रस इस्टेट/विमा/६४३७/२०१९, दिनांक २२ नोव्हेंबर, २०१९

**शासन शुध्दीपत्रक:-**

उपरोक्त वाचा येथे नमूद क्रमांक १ येथील शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक ३ येथे नमूद केलेल्या " तसेच परिच्छेद क्रमांक १ नुसार सदर योजनेकरिता वितरित करण्यात आलेला निधी कोषागारातून आंहरित करण्याकरिता लेखाधिकारी, संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी आणि आयुक्त कृषी), पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे" या **ऐवजी पुढीलप्रमाणे वाचावे**..

सदर निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यास तसेच खर्चावर नियंत्रण ठेवण्यासाठी आयुक्त (कृषी) यांना राज्य नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सदर निधीचे आंहरण व संवितरण करणेसाठी विविध स्तरावरील अधिकाऱ्यांना पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आंहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २ | विभाग स्तर | विभागीय कृषी सह संचालक, अमरावती व नागपूर | लेखाधिकारी, विभागीय कृषी सह संचालक कार्यालय, अमरावती व नागपूर. |
| ३ | जिल्हा स्तर | जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, अमरावती, नागपूर व वर्धा | लेखाधिकारी, जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी कार्यालय, अमरावती, नागपूर व वर्धा. |

२. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१९१२१११११२११४०००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Ashok Maroti Atram
Date: 2019.12.11 11:24:47 +05'30'

**(अशोक आत्राम)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३) मा. राज्यमंत्री (कृषी व फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव.
४) मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई.
५) मा. सभापती/उप सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई
६) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८) सचिव (कृषी) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) कुलसचिव, कृषी विद्यापीठे, महाराष्ट्र राज्य.
११) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर
१३) विभागीय कृषी सह संचालक, अमरावती व नागपूर.
१४) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई.
१५) जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, नागपूर, अमरावती व वर्धा.
१६) कृषी विभागातील सर्व कक्ष अधिकारी, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) निवडनस्ती -९अे, संग्रहार्थ.